**कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळ (प्रतिबंध मनाई व निवारण) अधिनियम - २०१३ मधील तरतुदीनुसार अंतर्गत तक्रार समितीची पुर्नरचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२७१९/प्र क्र ३६/का-२१ आस्था**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ सप्टेंबर, २०२१

<u>संदर्भ</u> :- १) महिला व बालविकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक मकक-२०१०/ प्र क्र४६/ मकक, दि ११.०६.२०१०
२) महिला व बालविकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक मकचै-२०१०/ प्र क्र६३/ मकक, दि १९.०६.२०१४
३) सा प्र वि कार्यालयीन आदेश क्र संकीर्ण-२७१९/प्र क्र ३६/का-२१ आस्था,दि ०७.०३.२०१९
४) सा प्र वि कार्यालयीन आदेश क्र संकीर्ण-२७१९/प्र क्र ३६/का-२१ आस्था,दि ०१.०३.२०१९

**<u>प्रस्तावना</u>:-**

केंद्र शासनाकडून कामाच्या ठिकाणी महिलांचे छळापासून संरक्षण (प्रतिबंध,मनाई व निवारण) अधिनियम दिनांक २३.०४.२०१३ व त्या अंर्तगत दिनांक ९.१२.२०१३ रोजी नियम प्रसिध्द करण्यात आलेले असून प्रत्येक कार्यालयात अंतर्गत तक्रार समिती स्थापन करण्याबाबत महिला व बालविकास विभागाचा शासन निर्णय दिनांक १९.०६.२०१४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुसार मंत्री आस्थापनेच्या अधीनस्त मा.मुख्यमंत्री सचिवालय, मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील कार्यरत महिला अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी तक्रार समिती गठीत करण्यात आली आहे.सदर समितीचे अध्यक्ष यांची पदोन्नतीने अन्य कार्यासनात बदली झालेली आहे.तसेच समितीचे सदस्य यांची अन्य विभागात बदली झालेली आहे व समितीचे अन्य सदस्य नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्या असल्यामुळे समितीची पुर्नरचना करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक ७.३.२०१९ अन्वये कामाच्या ठिकाणी महिलांचे लैगिंक छळापासून संरक्षण (प्रतिबंध,मनाई व निवारण) अधिनियम २०१३ अंतर्गत मंत्री आस्थापनेच्या अधीनस्थ मा. मुख्यमंत्री सचिवालय, मा.उपमुख्यमंत्री, मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील प्रतिनियुक्तीने कार्यरत महिला अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी लैंगिक छळाबाबत येणाऱ्या तक्रारींची चौकशी करणे व त्यानुसार कार्यवाहीची शिफारस करणे याकरिता खालीलप्रमाणे तक्रार समितीची पुर्नरचना करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती कल्याणी धारप, कक्ष अधिकारी (साप्रवि का-२१) | : | अध्यक्ष |
| २. | श्री प्र.कि.सांगळे कक्ष अधिकारी (साप्रवि का- २१ /रोख) | : | सदस्य |
| ३. | श्रीमती संगिता गुल्हाणे, कक्ष अधिकारी (साप्रवि का-२१-अ) | : | सदस्य |
| ४. | श्रीमती शिल्पा नातू, कक्ष अधिकारी (मुख्यमंत्री सचिवालय) | : | सदस्य |
| ५. | श्रीम रोहिणी सकपाळ, सहायक कक्ष अधिकारी (साप्रवि का-२१) | : | सदस्य सचिव |
| ६. | श्रीमती सुनिला भिसे, संचालक, सावली प्रतिष्ठान, अ/२, धनराज अपार्टमेंट, दिवानमन नवयुग नगर, वसई रोड (पश्चिम), तालुका पालघर ४०१२०१. | : | अशासकीय सदस्य |

२. मा.मुख्यमंत्री सचिवालय, मा.उपमुख्यमंत्री,मा.मंत्री व मा.राज्यमंत्री कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत महिला अधिकारी/कर्मचारी यांना याद्वारे असे कळविण्यात येते की, त्यांनी लैंगिक छळासंदर्भात कोणतीही तक्रार असल्यास, ती महिला तक्रार निवारण समितीच्या अध्यक्ष किंवा सदस्य सचिवांकडे सादर करावी.

३. उपरोक्त समिती मा.मुख्यमंत्री सचिवालय, मा.उपमुख्यमंत्री,मा.मंत्री व मा.राज्यमंत्री कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत महिला अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून लैंगिक छळासंदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारींची चौकशी करुन कारवाईची शिफारस करेल.

४. उपरोक्त समितीच्या नावाचा फलक विभागाच्या दर्शनी लावण्याची कार्यवाही कार्यासन २१-अ यांनी तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२९१२२६३६१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Kalyani Hemant Dharap
Date: 2021.09.29 12:31:47 +05'30'

**( कल्याणी धारप )**
कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१. सह सचिव (आस्थापना), मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सह सचिव (आस्थापना), मा.उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व महिला अधिकारी/कर्मचारी, मा.मुख्यमंत्री सचिवालय/मा.उपमुख्यमंत्री/मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
५. श्रीमती कल्याणी धारप, कक्ष अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. श्रीमती संगिता गुल्हाणे, कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. श्रीमती शिल्पा नातू, कक्ष अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२.
८. श्री प्र.की.सांगळे, कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. श्रीम रोहिणी सकपाळ ,सहायक कक्ष अधिकारी ,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. श्रीमती सुनिला भिसे, संचालक, सावली प्रतिष्ठान, अ/२, धनराज अपार्टमेंट, दिवानमन नवयुग नगर, वसई रोड (पश्चिम), तालुका पालघर ४०१२०१.
११. अवर सचिव (मकक), महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवड नस्ती (का-२१ आस्था).